अतिप्रदान रकमेच्या अनुषंगाने शिक्षक/शिक्षकेतर कर्मचाऱ्यांकडून वचनपत्र घेण्याबाबत....

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक: वेतन-१२२१/प्र.क्र.११९/टीएनटी-३**

हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई- ३२
दिनांक :- २२ डिसेंबर, २०२१

**वाचा-**

१) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांक- संकीर्ण-२०२१/प्र.क्र.५२/सेवा-३, दि.२२.११.२०२१.

२) सिव्हील अपील क्रमांक ३५००/२००६ (पंजाब व हरीयाणा उच्च न्यायालय व इतर विरुद्ध जगदेव सिंग) यामधील मा.सर्वोच्च न्यायालय, नवी दिल्ली यांचा दिनांक २९.०७.२०१६ चा अंतिम निर्णय

३) मा.उच्च न्यायालय, औरंगाबाद खंडपीठ येथे दाखल झालेल्या याचिका क्रमांक ३४८०/२०२० मध्ये मा.उच्च न्यायालयाने दि. १५.०९.२०२१ रोजी दिलेला न्यायनिर्णय.

**प्रस्तावना-**

वित्त विभागाने संदर्भाधिन क्र.१ मध्ये नमूद शासन परिपत्रक अन्वये गट-अ गट-ब, गट-ब (अराजपत्रित), गट-क व गट-ड मधील राज्य शासकीय अधिकारी व कर्मचाऱ्यांना त्यांच्या सेवाकाळामध्ये विविध प्रसंगी त्यांना नियमानुसार अथवा कायद्यानुसार देय व अनुज्ञेय ठरत नसताना (Excess of their entitlements), शासकीय रकमांचे अतिप्रदान (Excess payment) होत असल्याचे निदर्शनास आल्यास अशी अतिप्रदानाची रक्कम लाभधारक शासनास परत करण्यास बांधील असेल असे वचनपत्र (Undertaking) घेण्याचे आदेश दिले आहेत. शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांना नियमानुसार अथवा कायद्यानुसार देय व अनुज्ञेय ठरत नसताना शासकीय रकमांचे अतिप्रदान होत असल्याचे निदर्शनास आल्यास अतिप्रदान करण्यात आलेली रक्कम संबंधित कर्मचारी शासनास परत करील या आशयाचे वचनपत्र (Undertaking) घेण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**परिपत्रक -**

मा.सर्वोच्च न्यायालयात श्री जगदेव सिंग यांनी दाखल केलेल्या याचिका प्रकरणी दिलेल्या न्यायनिर्णयाचा आधार घेऊन मा.उच्च न्यायालयाने (खंडपीठ औरंगाबाद) याचिका क्रमांक ३४८०/२०२० मध्ये दि.१५.०९.२०२१ रोजी दिलेल्या आदेशामध्ये शासकीय खजिन्यातील निधी हा करदात्यांकडून जमा करण्यात आलेला सामान्य जनतेचा पैसा असून कोणत्याही प्रकारे करदात्यांच्या पैशांचा अपव्यय होणार नाही या दृष्टीने भविष्यात वसूल न होऊ शकणाऱ्या अतिप्रदान होणाऱ्या रकमेस पायबंद घालणे गरजेचे असल्याने शासनाकडून लाभधारकांना कोणत्याही रकमेचे अतिप्रदान करण्यात आले आहे, असे भविष्यात निदर्शनास आल्यास अशी अतिप्रदानाची रक्कम लाभधारक, शासनास परत करण्यास बांधील राहील अशा आशयाचे लिखित वचनपत्र (Undertaking) घेण्यात यावे, असे शासनास आदेशित केले आहे. त्यानुसार वित्त विभागाने गट-अ, गट-ब, गट-ब (अराजपत्रित), गट-क व गट-ड मधील राज्य शासकीय अधिकारी व कर्मचाऱ्यांकडून असे वचनपत्र घेण्याचे आदेश दिले आहेत.

आता शासन राज्यातील खाजगी अनुदानित व अंशत: अनुदानित शाळांतील तसेच स्थानिक स्वराज्य संस्थांतील सर्व शिक्षक व शिक्षकेतर कर्मचारी (प्राथमिक/माध्यमिक/उच्च माध्यमिक) यांच्याकडून त्यांना कोणत्याही कारणास्तव शासनाच्या नियमापेक्षा जास्त रक्कम प्रदान करण्यात आल्यास अशी अतिप्रदानाची रक्कम लाभकारक, शासनास परत करील अशा आशयाचे लिखित वचनपत्र (Undertaking) घेण्याचे आदेश देत आहे.

वचनपत्र (Undertaking) घेण्याच्या तरतुदी वित्त विभागाने निर्गमित केलेल्या परिपत्रकाप्रमाणे पुढीलप्रमाणे असतील. जे शिक्षक/शिक्षकेतर कर्मचारी सद्यस्थितीत शासन सेवेत आहेत त्यांच्याकडून हे वचनपत्र या परिपत्रकाच्या दिनांकापासून ३ महिन्यांच्या आत घेण्यात यावे. तथापि जे कर्मचारी सेवानिवृत्त होत आहेत त्यांच्याबाबत तात्काळ त्यांच्या सेवानिवृत्तीपूर्वी घेण्यात यावे. जे कर्मचारी शासन सेवेत नव्याने दाखल/नियुक्त होतील त्यांच्यासंदर्भात हे वचनपत्र नियुक्तीच्या १ महिन्याच्या आत घेण्यात यावे. हे वचनपत्र शासनास विहीत वेळेत भरून देणे संबंधित शिक्षक/शिक्षकेतर यांना बंधनकारक आहे. सदरचे वचनपत्र संबंधितांनी विहीत कालावधीत न दिल्यास त्यांचे त्यापुढील विहीत कालावधीनंतरचे वेतन रोखण्याबाबत आहरण व संवितरण अधिकाऱ्यांनी कार्यवाही करावी. हे वचनपत्र संबंधित शिक्षक/शिक्षकेतर कर्मचारी यांच्या संपूर्ण सेवा कालावधीसाठी लागू राहील याची सर्वांनी नोंद घ्यावी. तसेच हे वचनपत्र घेतल्याबाबतची नोंद सेवापुस्तकात घेण्यात यावी. तसेच सदरचे वचनपत्र सेवापुस्तकात जोडण्यात यावे. सदर कार्यपद्धतीचे पालन करण्याची प्राथमिक जबाबदारी आहरण व संवितरण अधिकारी यांची राहील. सदर कार्यपद्धतीचे पालन न झाल्यास संबंधित आहरण व संवितरण अधिकारी योग्य त्या कारवाईस पात्र राहतील याची नोंद घ्यावी. (वचनपत्राचा नमुना सोबत जोडलेला आहे.)

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०२११२२२१७०४२७३७२१ असा आहे. हे परिपत्रक डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by Sameer Anant Sawant
Date: 2021.12.22 17:07:03 +05'30'

**( स.अ.सावंत )**

**उपसचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे
२. शिक्षण संचालक प्राथमिक/ माध्यमिक व उच्च माध्यमिक, महाराष्ट्र राज्य, पुणे
३. संचालक, महाराष्ट्र राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद, पुणे
४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र - १ / २, मुंबई / नागपूर
५. महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र - १ / २, मुंबई / नागपूर
६. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
७. लेखाधिकारी, वेतन पडताळणी पथक, मुंबई/नागपूर/पुणे/औरंगाबाद
८. मुख्य अधिकारी, सर्व नगरपालिका/नगरपरिषदा

९. सर्व शिक्षणाधिकारी (प्राथमिक / माध्यमिक / प्रौढ)
१०. सर्व अधिक्षक, वेतन पथक (प्राथमिक / माध्यमिक)
११. शिक्षण निरीक्षक (उत्तर/दक्षिण/पश्चिम), मुंबई
१२. अर्थसंकल्प, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
१३. निवड नस्ती (टीएनटी-३) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई.

(शासन परिपत्रक, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, क्रमांक वेतन-१०२१/प्र.क्र.११९/टीएनटी-३, दिनांक - २२.१२.२०२१ चे सहपत्र)

## वचनपत्र

मी, श्री./श्रीमती............................., ......................... या शाळेत/स्थानिक स्वराज्य संस्थेत, .................. या पदावर कार्यरत आहे. मला शासनाकडून कोणत्याही प्रसंगी जसे की, माझी सेवेत नव्याने नियुक्ती होईल तेव्हा किंवा अन्य प्रकारे वेतननिश्चिती / वेतनवाढी अथवा इतर कोणत्याही आर्थिक लाभाच्या/प्रदानाच्या अनुषंगाने माझ्या संपूर्ण सेवा कालावधीत, नियमानुसार अथवा कायद्यानुसार देय व अनुज्ञेय ठरत नसताना (Excess of entitlements), अतिरिक्त रक्कम प्रदान झाल्याची बाब सद्य:स्थितीत/भविष्यात शासनाच्या निदर्शनास आली/आल्यास, याद्वारे मी असे वचनपत्र देतो की, परिगणनेतील त्रुटीमुळे अथवा कोणत्याही कारणास्तव सदर रकमेमध्ये काही जादा रकमेचे प्रदान केल्याचे सद्यस्थितीत/भविष्यात शासनाच्या निदर्शनास आल्यास अशी अतिप्रदानाची रक्कम शासनास समायोजन/रोख स्वरुपात परत करण्यास मी न चुकता बांधील आहे/राहील.

सही,

ठिकाण : नाव........................

दिनांक: पदनाम...................